महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या वार्षिक अहवालात नोंदविण्यात आलेल्या 'आयोगाचा सल्ला डावलणे व अनियमितता' या बाबीवर स्पष्टीकरणात्मक टिप्पणी पाठविण्यासाठी संबंधित प्रशासकीय विभागाने करावयाच्या कार्यवाहीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**परिपत्रक क्र. मलोआ-१०१०/प्र.क्र.८२/२०१०/आठ**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ७ डिसेंबर, २०१०.**

**वाचा :** शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मलोआ-१००९/प्र.क्र.२००९/आठ, दि.१०.८.२००९.

**परिपत्रक :-**

विविध सेवाविषयक प्रकरणी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचा सल्ला घेण्यासाठी अथवा मान्यता घेण्यासाठी मंत्रालयीन प्रशासकीय विभागांकडून आयोगाकडे वेळोवेळी नस्त्या सादर केल्या जातात. प्रशासकीय विभागांनी आयोगाकडे पाठविलेल्या अशा प्रकरणी आयोगाकडून एकतर विभागाच्या प्रस्तावास सहमती दर्शविली जाते अथवा प्रकरणपरत्वे विशिष्ट सल्ला दिला जातो. आयोगाने दिलेल्या सल्ल्यापेक्षा शासनाचे वेगळे मत असल्यास अशावेळी आयोगाचा सल्ला डावलण्यात येतो. शासनाने आयोगाचा सल्ला डावलला आहे अशा प्रकरणांची, त्याचप्रमाणे प्रशासकीय विभागांकडून आयोगाकडे पाठविण्यात आलेल्या प्रकरणांमध्ये गंभीर स्वरुपाची अनियमितता आयोगास आढळल्यास अशा अनियमिततेची नोंद आयोगाकडून त्यांच्या वार्षिक अहवालामध्ये घेतली जाते. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने तयार केलेले त्यांचे वार्षिक अहवाल सांविधानिक तरतूदीनुसार विधानमंडळासमोर ठेवताना सल्ला डावललेल्या प्रकरणाची स्पष्टीकरणात्मक टिप्पणी अहवालासोबत ठेवणे आवश्यक असते.

वरील कार्यवाही करताना प्रचलित कार्यपध्दतीप्रमाणे सल्ला डावलणे / अनियमितता याविषयी स्पष्टीकरणात्मक टिप्पणी संबंधित प्रशासकीय विभागाकडून मंत्रिमंडळाची मान्यता घेवून नंतर या विभागाकडे पाठविली जाते. तथापि, अशी कार्यवाही संबंधित विभागांकडून अतिशय विलंबाने केली जात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले असून त्यामुळे आयोगाचे वार्षिक अहवाल विधानमंडळाच्या पटलावर ठेवण्याची कार्यवाही प्रलंबित राहिलेली आहे. यासंदर्भात आता प्रचलित कार्यपध्दतीत सुधारणा करण्यात येत असून सर्व प्रशासकीय विभागांनी खालीलप्रमाणे कार्यपध्दती अनुसरावी.

"महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या वार्षिक अहवालामध्ये सल्ला डावलणे / अनियमितता या वरील मुद्दे ज्या प्रशासकीय विभागाशी संबंधित असतील त्या प्रशासकीय विभागांनी त्या मुद्यांवरील स्पष्टीकरणात्मक टिप्पण्यांना त्यांच्या प्रभारी मंत्र्यांची मान्यता घेवून त्या टिप्पण्या (मराठी व इंग्रजीमध्ये) सामान्य प्रशासन

विभागाकडे पाठवाव्यात. सामान्य प्रशासन विभाग अशा स्पष्टीकरणात्मक टिप्पण्यांसह वार्षिक अहवाल मंत्रिमंडळासमोर सादर करुन स्पष्टीकरणात्मक टिप्पण्यांना तसेच त्यासह अहवाल विधानमंडळाच्या पटलावर ठेवण्यास मान्यता घेईल. मात्र अशा मंत्रिमंडळाच्या बैठकीस स्पष्टीकरणात्मक टिप्पणी ज्या विभागाशी संबंधित असेल त्या संबंधित प्रशासकीय विभागाच्या सचिवांनी उपस्थित राहणे आवश्यक राहिल व या संदर्भातील आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी त्या-त्या प्रशासकीय विभागाची राहील."

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(श्री. प्र. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने)
सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिवांचे स्वीय सहायक
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (आस्थापना शाखा)
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
निवडनस्ती / सा.प्र.वि./कार्यासन आठ संग्रहार्थ

H 2751-1 30

C:\Documents and Settings\VAISHALI\Local Settings\Temporary Internet Files\Content.IE5\6VOP4P47